शासकीय अधिकारी कर्मचारी व त्यांचे कुटुंबिय यांना संगणक प्रशिक्षणासाठी ५०% सवलतींचा लाभ घेण्यास परवानगी देण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
परिपत्रक क्रमांक सीओएम१०.००/प्रक्र४६/२०००/३९,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १८, मार्च २०००

## परिपत्रक

मे. ॲपटेक लिमिटेड, मुंबई यांनी त्यांच्या दिनांक १४ फेब्रुवारी २००० च्या पत्रान्वये ॲपटेक कॉम्प्युटर एज्युकेशन कोर्सेस (Aptech Computer Education courses) आणि अरीना मल्टीमिडीया (Arena Multimedia) या संदर्भातील संगणक विषयक पाठ्यक्रमासाठी राज्य शासनाचे अधिकारी/कर्मचारी व त्यांच्या कुटुंबियांना सर्वसाधारणपणे आकारण्यात येणाऱ्या शुल्कामध्ये ५०% इतकी सवलत देण्याचा प्रस्ताव यविभागास सादर केला होता.

मे. ॲपटेक लिमिटेड, मुंबई यांनी सदर सवलतीसाठी खालील अटी नमूद केलेल्या आहेत.

(अ) राज्य शासनात सदर सवलत त्यांचे अधिकारी/कर्मचारी, त्यांचे पती/पत्नी व त्यांची मुले ( दोन पेक्षा अधिक नाही) यांना उपलब्ध राहील.

(ब) सदर सवलत वर्ष एप्रिल २००० ते मार्च २००१ पर्यंत उपलब्ध असेल.

राज्य शासनाने शासकीय कामकाजाच्या संगणकीकरणाचा मोठा कार्यक्रम हाती घेतलेला आहे. या संदर्भात विचार करुन सदर सवलतीचा राज्य शासनाच्या संगणकीकरणाच्या कार्यक्रमामध्ये मोठा उपयोग होईल म्हणून मे. ॲपटेक लिमिटेड, मुंबई या संस्थेने त्यांच्या प्रशिक्षण कार्यक्रमात दिलेल्या सवलतीचा लाभ शासकीय कर्मचाऱ्यांना घेण्यास परवानगी देण्यात येत आहे

सदर सवलतीचा लाभ घेण्याबाबतचा निर्णय संबंधीत कर्मचाऱ्यांचा राहील व सदर सवलतीचा लाभ शासकीय कर्मचाऱ्यांनी घ्यावा या करिता त्यांच्या वरीष्ठांनी सक्ती वा पाठपुरावा करु नये. मे. ॲपटेक,लि. मुंबई, या संस्थेस शासकीय कार्यालय प्रमुखांना सदर सवलतीबाबतची माहिती करुन देण्याची परवानगी राहील. कार्यालय प्रमुखांनी जे कर्मचारी या सवलतीचा लाभ घेण्यास इच्छुक आहेत अशा कर्मचा-यांना ते अथवा त्यांचे कुटुंबिय सदर सवलत उपभोगण्यास पात्र असल्याबाबतचे प्रमाणित करावे.

हे परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग (सेवा उप विभाग) यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

( प्र. शं. शेटे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,
राज्यपालांचे सचिव,

मुख्यमंत्र्यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
* प्रबंधक, उच्च न्यायालय,मूळ शाखा,मुंबई
* प्रबंधक,उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
* प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकायुक्त,मुंबई
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग ,मुंबई
* सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय (विधान सभा),मुंबई
* सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय (विधान परिषद)] मुंबई
* सचिव, राज्य निवडणूक आयोग मुंबई,
महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र ,मुंबई
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र,नागपूर
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई /लेखाकोष भवन, वान्द्रे(पूर्व) मुंबई
'निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हापरिषदांचे मुख्यकार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार कार्यालये
मंत्रालय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती (२ प्रती)

* (पत्राने)

* * * * *